**सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब**
**या पदावर परिविक्षाधीन नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-१२११/प्र.क्र.४/१२-स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
तारीख: २८ नोव्हेंबर,२०१४

**वाचा :**

१) शासन निर्णय समक्रमांक, दि.१७/१०/२०११

२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१४७७(२)/२००९/(खेळाडू) /चौदा-अ, दि.३१/१०/२०१४.

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत राज्य सेवा (मुख्य) परीक्षा २००९ अन्वये सहायक निबंधक, सहकारी संस्था गट-ब या पदावरील नियुक्तीसाठी एकूण ३८ उमेदवारांची शिफारस आयोगाने केली होती. त्यापैकी श्रीमती संध्या चिंतामण पडोळे यांची अमागास (खेळाडू) या प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या पदांसाठी गुणवत्ता क्रमानुसार शिफारस क्र.३२ (इमाव) महिला अधिकारी म्हणून निवड झाली. सदर शिफारशीच्या अनुषंगाने श्रीमती पडोळे यांचे तायक्वंदो या खेळाचे प्रमाणपत्र दि.३०/७/२०११ रोजीच्या पत्रान्वये संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे पडताळणीसाठी पाठविण्यात आले होते. तथापि, एक महिन्यापेक्षा जास्त कालावधीपर्यंत खेळविषयक प्रमाणपत्राची पडताळणी झाली नसल्याने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/ क्रीयुसे-२, दि.३०/४/२००५ मधील अ.क्र.१७ च्या तरतूदीनुसार श्रीमती पडोळे यांना खेळविषयक प्रमाणपत्र पडताळणीच्या अधिन या विभागाच्या संदर्भाधिन दि.१७/१०/२०११ च्या शासन निर्णयान्वये सहायक निबंधक, सहकारी संस्था, अपील न्यायालय, मुंबई या पदावर तात्पुरती नियुक्ती देण्यात आली होती. तद्नंतर संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी श्रीमती पडोळे यांनी सादर केलेल्या तायक्वंदो खेळाच्या प्रमाणपत्राची पडताळणी केली असता, १७ वी नॅशनल तायक्वांदो क्रीडा स्पर्धा इंडीयन ऑलिम्पिक असोसिएशन या संघटनेस संलग्न असलेल्या राष्ट्रीय संघटनेने आयोजित केलेली नसल्यामुळे, श्रीमती संध्या पडोळे या उपरोक्त क्रीडा कामगिरीच्या आधारे गट-ब / क /ड पदाकरीता विहित केलेली खेळविषयक अर्हता पूर्ण करीत नसल्याबाबत कळविले. तथापि, श्रीमती पडोळे यांनी राज्य सेवा (मुख्य) परिक्षा २००९ या परिक्षेसाठी अर्ज करतांना इमाव-महिला, तसेच खेळाडू प्रवर्गासाठी दावा केला होता. त्यानुसार त्यांनी उपजिल्हाधिकारी, नागपूर यांच्या दि.७/३/२००९ चे इमाव प्रवर्गाचे जातीचे प्रमाणपत्र सादर केले असून विभागीय जात प्रमाणपत्र

पडताळणी समिती, नागपूर विभाग नागपूर यांच्या दि.२७/२/२००७ रोजीची (इमाव-तेली) जात वैधता प्रमाणपत्राची प्रत सादर केली आहे. सदरहू वस्तुस्थितीच्या आधारे श्रीमती संध्या पडोळे या उमेदवार उपरोक्त क्रीडा कामगिरीच्या आधारे गट-ब / क /ड पदाकरीता विहित केलेली खेळविषयक अर्हता पूर्ण करीत नसल्याची बाब महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निदर्शनास आणल्यानुसार, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने, श्रीमती संध्या पडोळे यांनी त्यांच्या प्रस्तुत परीक्षेच्या अर्जात इ.मा.व. (महिला) वर्गवारीचाही दावा केला आहे. त्यामुळे प्रस्तुत परीक्षेच्या अंतिम गुणवत्ता यादीतील त्यांचा गुणवत्त क्रम, त्यांनी पदांसाठी दिलेला पसंतीक्रम व अर्जात केलेला इ.मा.व. (महिला) वर्गवारीचा दावा विचारात घेता त्या सहायक निबंधक, सहकारी संस्था,गट-ब या पदावर इ.मा.व.(महिला) वर्गवारीतून देखील शिफारशीस पात्र ठरतात. ही बाब विचारात घेवून श्रीमती संध्या पडोळे यांना सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या पदावर इ.मा.व. (महिला) उमेदवार म्हणून समावून घेण्याबाबत शिफारस केली.

सन २००९ च्या मागणीपत्रामध्ये इमाव (महिला) या प्रवर्गासाठी फक्त २ बिंदू उपलब्ध होते त्यानुसार शिफारस यादीतील अनुक्रमांक २९- श्रीमती स्मिता वायचळे यांना ९९१ गुण व अनुक्रमांक ३३- श्रीमती रिटा निनावे, यांना ९७५ गुण प्राप्त झाले असून त्यांची इमाव (महिला) या प्रवर्गातून निवड झाली आहे. तथापि, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची उपरोक्त शिफारस विचारात घेता, श्रीमती पडोळे (इमाव-महिला) यांना ९७६ गुण प्राप्त झाले असल्याने त्यांना श्रीमती निनावे यांच्या जागी दर्शवावे लागेल, ही बाब विचारात घेवून या प्रकरणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पुन्हा अभिप्राय प्राप्त करुन घेतले असता राज्यसेवा (मुख्य) परीक्षा २००९ मधील अनुक्रमांक २१ वरील उमेदवार श्रीमती वैशाली विठ्ठल शिंदे यांची अराखीव (महिला)- १ म्हणून शिफारस करण्यात आली होती. तथापि प्रस्तूत पदी त्यांनी नियुक्ती स्विकारली नसल्याने, शिफारस यादीतील अराखीव (महिला) व इ.मा.व. (महिला) वर्गवारीतून शिफारस पात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांच्या गुणवत्ताक्रमाकात आपोआप बदल होत असल्याने अराखीव (महिला) व इमाव (महिला) यांचे सुधारित गुणवत्ताक्रम महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपलब्ध करुन दिले आहेत. त्यानुसार श्रीमती संध्या पडोळे व श्रीमती रिटा निनावे यांच्या मूळ नियुक्ती आदेशात प्राप्त सुधारित गुणवत्ताक्रमानुसार बदल करुन सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय शुध्दीपत्रक:**

वाचा येथील अनुक्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शासनाच्या सहकार विभागात सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गातील पदावर, सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या ३८ उमेदवारांपैकी ३६ उमेदवारांच्या

नेमणूका सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या पदावर रु. ९३००-३४८०० (ग्रेड-पे ४४००) या वेतनश्रेणीत दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता नामनिर्देशनाने करण्यात आलेल्या असून त्याना **परिशिष्ट "ब"** प्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने वाचा येथील अनुक्रमांक २ येथील संदर्भाधीन पत्रान्वये राज्येसेवा मुख्य परीक्षा-२००९ च्या परीक्षेतील सहायक निबंधक, गट-ब या पदाकरिता अराखीव महिलांकरिता राखीव असलेल्या ६ महिला उमेदवारांपैकी शिफारस यादीतील अनुक्रमांक २१ वरील उमेदवार श्रीमती वैशाली विठ्ठल शिंदे अराखीव (महिला)-१ यांनी प्रस्तुत पदी नियुक्ती स्विकारलेली नाही. त्यामुळे शिफारस यादीतील अराखीव (महिला) व इ.मा.व. (महिला) वर्गवारीतून शिफारस पात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांच्या गुणवत्ताक्रमाकात आपोआप बदल होत असल्याने अराखीव (महिला) व इमाव (महिला) यांचे सुधारित गुणवत्ता क्रम उपलब्ध करुन दिले आहेत. त्यानुसार उपरोक्त दि.१७.१०.२०११ च्या शासन निर्णयातील परि.६ व ७ मध्ये दर्शविलेल्या उमेदवारांपैकी परिशिष्ट "ब" मधील अनुक्रमांक ३० येथील श्रीमती पडोळे संध्या चिंतामण यांना इमाव (महिला)- १ व अ.क्र.३१ येथील श्रीमती निनावे रिटा बाळकृष्ण यांना इमाव (महिला)- २ या सुधारित वर्गवारीनुसार त्यांची मूळ नियुक्ती आदेशात सहायक निबंधक, सहकारी संस्था,गट-ब या संवर्गात नियुक्ती दर्शविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२८१५०८०७८८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2014.11.28 15:16:21 +05'30'

(सु.मु.धाडवे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर

५. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरीक्षण)

७. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, मुंबई, अमरावती

८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

९. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती

१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

११.मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री (सहकार)/मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.

१२.सर्व संबंधित अधिकारी (परिशिष्ट "ब" प्रमाणे) (डाक पोच नोंद देय टपालाने)

१३.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.प्रधान सचिव (वस्त्रोद्योग)/प्रधान सचिव (सहकार व पणन), मंत्रालय.

१६.कक्ष अधिकारी ५-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

१७. निवड नस्ती.

## परिशिष्ट - ब

## शासन निर्णय क्रमांक राजस-१२११/प्र.क्र.४/१२-स, दि. २८ नोव्हेंबर, २०१४

| अ.क्र. | उमेदवारांचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| ३० | श्रीमती पडोळे संध्या चिंतामण<br>एसआरपी कॅम्प, ऑफिसर क्वार्टर्स नं.११,<br>हिंगणा रोड, नागपूर-४४००१६ | सहायक निबंधक,<br>सहकारी संस्था, अपिल<br>न्यायालय, मुंबई |
| ३१ | श्रीमती निनावे रिता बाळकृष्ण<br>शिरभाते ले-आऊट, बांगर नगर,<br>यवतमाळ. | सहायक निबंधक,<br>सहकारी संस्था,<br>ता.बाभूळगांव,<br>जि.अमरावती |